## अध्याय ८१ वा.

[ १ संजय व धृतराष्ट्र यांचा चिंतायुक्त संवाद. ]

(१) **वैशंपायन**—हे परिक्षिता, पांडुपुत्रांचा द्यूतांत पराभव होऊन ते वनांत गेले असतां महाराज धृतराष्ट्राच्या मनांत फार मोठी चिंता उद्भवली. तेव्हां निःश्वास टाकीत चिंतातुर होऊन विचार करीत बसलेल्या त्या जनेश्वराला संजय बोलला—"हे वसुधाधिपा, तूं पांडवांचें राज्य हरण करून त्यांना वनवासाला पाठविलेंस व सर्व पृथ्वीचें राज्य प्राप्त करून घेतलेंस, मग आतां असा शोक कां करितोस?"

**धृतराष्ट्र** म्हणाला—हे संजया, युद्धविशारद, महारथ व बलाढ्य पांडवांशीं ज्यांनीं वैर संपादन केलें आहे त्यांच्या मनाला समाधान कोठचें!

**संजय** म्हणाला—राजन्, हें महावैर उद्भवण्यास तुझेंच सुकृत कारणीभूत झालें आहे. त्याचें पर्यवसान सर्व राजवंशांचा नाश होण्यांत होईल. बाबारे, भीष्म, द्रोण व विदुर हे निवारण करीत असतांहि तुझ्या मंदबुद्धि निर्लज्ज दुर्योधन-पुत्रानें सूतपुत्र प्रातिकामीला पांडवांची प्रिय भार्या जी धर्मचारिणी द्रौपदी तिला सभेंत आणावयास पाठविलें. हे राजा, देव ज्या पुरुषाचा पराभव करूं इच्छितात त्याच्या बुद्धीचा भ्रंश ते अगोदर करितात व त्यामुळें तो पुरुष सर्वच विपरीत पाहूं लागतो. मनुष्याची बुद्धि एकदा कलुषित झाली व त्याचा विनाश होण्याचा प्रसंग आला म्हणजे नीतीप्रमाणें भासणारी अनीति त्याच्या हृदयाला सोडीत नाहीं. त्याचा विनाश करण्यासाठीं अनर्थ अर्थरूपानें व अर्थ अनर्थरूपानें उपस्थित होतात आणि खरोखर ते त्यालाहि आवडतात.

राजन्, काल दंड उचलून कोणाच्याही मस्तकावर प्रहार करीत नाहीं. तर पुरुषाची बुद्धि विपरीत करून त्याला विपरीत अर्थ भासविणें, एवढेंच कालाचें

---

१ यस्मै देवाः प्रयच्छन्ति पुरुषाय पराभवम्। बुद्धिं तस्यापकर्षंति सोवाचीनानि पश्यति ॥ २ बुद्धौ कलुषभूतायां विनाशे समुपस्थिते । अनयो नयसंकाशो हृदयान्नापसर्पति ॥ अनर्थाश्चार्थरूपेण अर्थाश्चानर्थरूपिणः । उत्तिष्ठंति विनाशाय नूनं तच्चास्य रोचते ॥ ३ न कालो दंडमुद्यम्य शिरः कृंतति कस्यचित् । कालस्य बलमेतावद्विपरीतार्थदर्शनम् ॥

बल आहे. तपस्विनी, अयोनिजा, रूपवती व अग्नीच्या कुलामध्यें झालेली जी पांचाली, तिला सभेमध्यें ओढून आणणाऱ्या तुझ्या पुत्रांनीं कालाच्या प्रेरणेनेंच हें घोर, निंद्य व रोमहर्षण कृत्य केलें आहे. कपटद्यूत खेळणाऱ्या तुझ्या हीनबुद्धि पुत्रांवांचून दुसरा कोणता बरें पुरुष त्या सर्वधर्मज्ञ यशस्विनी पांडवपत्नीला हातानें स्पर्श करून सभेमध्यें ओढून आणील!

ती श्रेष्ठ राजकन्या पांचाली स्त्रीधर्मिणी असतांना, तिचें अंग मलीन झालेलें असतांना व ती एकवस्त्रा असतांना तुझ्या पुत्रांनीं तिच्याशीं अतिप्रसंग केला. त्या साध्वीनें सभेमध्यें ज्यांचें धन, राज्य व वस्त्रें यांचा तुझ्या पुत्रांनीं अपहार केला आहे, ज्यांची मुखश्री म्लान झाली आहे, जे सर्व सुखसाधनरहित होऊन दासभावाला प्राप्त झाले आहेत व धर्मपाशांनीं जखडून टाकिल्यामुळें जे पराक्रम करण्यास असमर्थ झाले आहेत, अशा पांडवांस पाहिलें.

हे राजा, तुझा ज्येष्ठ पुत्र दुर्योधन व त्याचा जिवलग मित्र कर्ण यांनीं कुरुसभेमध्यें क्रुद्ध व दुःखी झालेल्या कृष्णेला उद्देशून सर्वथा अनुचित भाषण केलें. त्या पांडुस्नुषेला असे कटुशब्द ऐकविणें हा घोर अन्याय आहे, असें मला वाटतें. राजा, तुझ्या सभेमध्यें घडलेला हा सर्व प्रकार तुला केव्हांहि सुखावह होणार नाहीं.

**धृतराष्ट्र** म्हणाला—हे संजया, त्या साध्वी पांचालीच्या क्रूर दृष्टीनें ही पृथ्वीहि जळून जाईल, असें मला वाटतें. हे साधो, माझ्या पुत्रांतील एखादा पुत्र तरी आतां जिवंत राहील का? या माझ्या निर्दय पुत्रांनीं जेव्हां धर्मिष्ठ, धर्मपत्नी व रूप-यौवनसंपन्न कृष्णेला सभेंत ओढून आणिलें, तेव्हां कौरवसभेंत विलाप करणाऱ्या तिला पाहून गांधारीसह भरतकुलांतील सर्व स्त्रियांहि हृदयद्रावक आक्रोश करूं लागल्या. सर्व प्रजांसह त्याहि प्रत्यहीं त्या कृत्याबद्दल शोक करीत आहेत.

संजया, द्रौपदीला अंतःपुरांतून ओढून आणल्यामुळें ब्राह्मण क्रुद्ध झाले व त्यामुळें ते सायंकाळीं अग्निहोत्राचें हवनहि करीनातसे झाले आहेत. त्या वेळीं झंझावात सुटला व विजेसारखा कडकडाट झाला. आकाशांतून पटापट उल्का पडल्या. पर्वकाल नसतांनाहि सूर्यग्रहण लागलें. त्यामुळें प्रजा भयभीत झाली. रथशालांमध्यें अग्नीचा भडका उठला. भरतकुलांतील वीरांचा नाश सुचविण्या-

साठीं रथांवरील ध्वज मोडून खालीं पडले. दुर्योधनाच्या अग्नीहोत्राजवळ भालू निर्भयपणें येऊन अशुभ ध्वनि करूं लागल्या व तो ऐकून गर्दभहि दाही दिशांमध्यें कर्णकटु शब्द करूं लागले.

हे संजया, द्रौपदीचा भरसभेंत झालेला अपमान पाहून द्रोणासह भीष्म, कृप, सोमदत्त व उदार बाह्लिक हे सर्व भारतांचे आधारस्तंभ सभेंतून निघून गेले. तेव्हां दीर्घदर्शी विदुरानें योग्य वेळीं प्रेरणा केल्यामुळें मीं 'कृष्णेला इष्ट वर देतों' असें म्हटलें. तेव्हां त्या साध्वीनें 'पांडवांना दास्यांतून मुक्त करा' असा वर मागितला. मींहि त्या माझ्या श्रेष्ठ स्नुषेला तो इष्ट वर देऊन वीर पांडवांना रथ व आयुधें यांसह खांडवप्रस्थास जाण्याची अनुज्ञा दिली.

तेव्हां सर्वधर्मज्ञ व महाप्राज्ञ विदुर म्हणाला—हे भरतवंशजांनो, ज्या अर्थी पांडूची स्नुषा कृष्णा आज तुमच्या सभेंत आली, त्या अर्थी तुमच्या कुलाचा आजच अंत झाला आहे, असें समजा. ही जी पांचाल राजाची कन्या पांचाली ती देवांची अनुत्तम श्री आहे. ( आदिपर्व अ. १९७ भा. २ पृ. ७८ ) देवांनींच दिल्यामुळें ती पांडवांना प्राप्त झाली आहे. असहिष्णु पांडव, महाधनुर्धर वृष्णि व महारथ पांचाल त्या कृष्णेचे क्लेश कदापि सहन करणार नाहींत. सत्यप्रतिज्ञ वासुदेवानें ज्यांचें रक्षण केलें आहे असा कुंतीपुत्र अर्जुन पांचालांसह तुमच्या हस्तिनापुरावर चाल करून येईल. त्या सर्वांच्या मध्यभागीं महाबलाढ्य व महापराक्रमी भीमसेन असून तो यमाच्या दंडाप्रमाणें उग्र असलेली आपली गदा गरगर फिरवीत कौरवांवर धांवेल.

तो महाज्ञानी पुनः म्हणाला—हे भरतहो, बुद्धिमान् पार्थाच्या गांडीव धनुष्याचा टणत्कार ऐकून त्याचे सर्व शत्रु भयभीत होतील. भीमाच्या गदेचा वेग सहन करण्यास पृथ्वींतील एकहि राजा समर्थ नाहीं, याविषयीं माझी पूर्ण खात्री आहे. यास्तव पार्थाशीं तुमचें नित्य सख्य असावें. त्याच्याशीं तुमचा कलह न व्हावा, असेंच मला निःसंशय वाटतें. या कौरवांपेक्षां पांडव अधिक बलवान् आहेत, असेंच माझें निश्चित मत आहे. एवढा मोठा बलाढ्य व महा तेजस्वी जरासंधराजा, पण भीमानें द्वंद्वयुद्धांत त्याला केवल बाहु याच एका शस्त्रानें यमसदनीं पाठविलें. यास्तव हे धृतराष्ट्रा, मी तुला पुनः पुनः सांगतों. तुझें पांडवांशीं सख्यच असो. हे राजा, कौरव व पांडव या दोन्ही पक्षांस जें हितावह असेल, तेंच निःशंकपणें कर. हे महाराजा, असें केल्यानेंच तुझें परम कल्याण होईल.

हे गावल्गणपुत्रा संजया, माझ्या भ्रात्या विदुरानें मला असा धर्मार्थयुक्त उपदेश केला. पण, केवल पुत्रांच्या स्वार्थाची इच्छा करणाऱ्या मीं मूर्खानें त्याकडे लक्षहि दिलें नाहीं. २. १०. ८१.

दहावें अनुद्यूतपर्व समाप्त झालें.

---

येथें दुसरें सभापर्वहि संपलें. यापुढें तिसरें वनपर्व सुरू होईल. त्याचा हा आद्य श्लोक आहे—

जनमेजय उवाच—

एवं द्यूतजिताः पार्थाः कोपिताश्च दुरात्मभिः ।
धार्तराष्ट्रैः सहामात्यैर्निकृत्या द्विजसत्तम ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु.